नागपूर जिल्हयातील नरखेड तालुक्यातील खालील नमूद पूर पुनर्वसित १० गांवामध्ये प्रशासकीय मान्यता प्राप्त नागरी सुविधा कामांकरिता निधी मंजूरीबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एलएफडी २०२०/प्र.क्र.६३/र-१२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ३१/०३/२०२२

**वाचा -**

१) महसुल व वन विभाग शासन निर्णय क्र.सीएफएल ५९९१/सीआर ६०८/म-३, दि.०६/०८/१९९१
२) महसुल व वन विभाग शासन निर्णय क्र.जीटीएल/एफएलडी-१०९१/प्र.क्र.१३२६/र-१२, दि.७/१२/१९९१
३) महसुल व वन विभाग शासन निर्णय क्र.जीटीएल/एफएलडी-१०९१/प्र.क्र.१३२६/र-१२, दि.२१/०४/१९९२
४) महसुल व वन विभाग शासन निर्णय क्र.सीएफएल ५९९१/सीआर ६०८(२)/म-३, दि.१२/०८/१९९१
५) महसुल व वन विभाग शासन निर्णय क्र.आरपीए-२००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.१.८.२००९
६) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि. १७/०४/२०१५
७) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-२०१५/प्र.क्र.२०/२०१५/विनियम, दि. १९/०१/२०१६
८) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे ज्ञापन क्र. मशा/ कार्या-७(३)/प्र.क.५८/२०२०, दि.२८/०३/२०२२
९) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र. मशा/ कार्या-७(३)/प्र.क.५८/कावि-४९७/२०२०, दि.२८/०३/२०२२

**प्रस्तावना-**

वर्धा नदीला सन जुलै १९९१ मध्ये अतिवृष्टीमुळे महापूर आला होता. त्यामध्ये बाधित झालेल्या कुटूंबाचे पुनर्वसन करण्यासाठी शासनाने दि.२१/४/१९९२ च्या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात आली आहे. तसेच पुनर्वसित भागात नागरी सुविधा कामांना संदर्भ क्र.८ येथील विभागीय आयुक्त यांच्या ज्ञापनान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्यानूसार संदर्भ क्र.९ अन्वये शासनास निधी मागणी प्रस्ताव सादर केला आहे.

२. प्रशासकीय मान्यता प्रदान नागरी सुविधा कामांच्या तसेच प्रकल्पयंत्रणेने सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने निविदा प्रक्रिया पुर्ण करुन कार्यारंभ आदेशान्वये काम सुरु करण्यासाठी नागरी सुविधा कामांसाठी निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

तद्नुसार, शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र.२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल २०१५ अनुसार वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७ (२) (अ) अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार, नागपूर जिल्हयातील नरखेड तालुक्यातील खालील नमूद पूर पुनर्वसित १० गांवामध्ये खालीलप्रमाणे नमूद केलेल्या नागरी सुविधेच्या कामाच्या निविदा प्रक्रिया पुर्ण करुन कार्यारंभ आदेशान्वये काम सुरु करण्यासाठी १० टक्के प्रमाणे सन २०२१-२०२२ या वित्तीय वर्षात BEAMS प्रणालीवर उपलब्ध तरतूदीतून रु.२०,७३,१२५/- (रुपये वीस लक्ष त्र्यहात्तर हजार एकशे पंचवीस फक्त) एवढा निधी विभागीय आयुक्त, नागपूर यांना एवढा निधी "मागणी क्रमांक सी-६,

२२४५-नैसर्गिक आपत्तींच्या निवारणासाठी सहाय्य, ०२-पूर, चक्रीवादळे, इत्यादी, १०१, अनुग्रह सहाय्य (९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरिक्त खर्च, (९२)(०४) पुरामुळे बाधीत झालेल्या व्यक्तींच्या पुनर्वसनाकरिता रस्ते, पाणी पुरवठा, शाळा, चावडी, विद्युत पुरवठा, नागरी सुविधावरील खर्च (अनिवार्य) (दत्तमत) (२२४५ २२२९) ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली विभागीय आयुक्त, नागपूर यांच्यामार्फत संबंधित कार्यन्वयन यंत्रणा कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम जिल्हा परिषद,नागपूर यांना खालील अटींच्या अधिन राहून उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **बाधित गावांचे नाव** | **कामाचे स्वरुप** | **विभागीय आयुक्त, नागपूर यांनी प्रशासकीय मान्यता प्राप्त अंदाजपत्रकानूसार किंमत (रुपयात)** | **निविदा प्रक्रिया पुर्ण करुन कार्यारंभ आदेशान्वये काम सुरु करण्यासाठी १० टक्के प्रमाणे** |
|---|---|---|---|---|
| १ | मौजा अंबाडा | बाजार ओटे | ११,९३,२८०/- | १,१९,३२८ |
| २ | मौजा थडीपवनी | बस थांबा | ७,२५,०००/- | ७२,५०० |
| ३ | मौजा थडीपवनी | बाजार ओटे | ११,९२,१६१/- | १,१९,२१६ |
| ४ | मौजा खेडी (खरबडी) | गुरांसाठी पाण्याचा हौद | १,३४,०००/- | १३,४०० |
| ५ | मौजा खरबडी | बाजार ओटे | ११,९१,३२०/- | १,१९,१३२ |
| ६ | मौजा खरबडी | समाजमंदीर | १७,९२,७१०/- | १,७९,२७१ |
| ७ | मौजा खरबडी | गुरांसाठी पाण्याचा हौद | १,३१,३६४/- | १३,१३६ |
| ८ | मौजा पेठ मुक्तापूर | समाजमंदीर | १७,९२,६१७/- | १,७९,२६२ |
| ९ | मौजा मदना | बस थांबा | ७,२५,०००/- | ७२,५०० |
| १० | मौजा देवग्राम | बस थांबा | ७,२५,०००/- | ७२,५०० |
| ११ | मौजा देवग्राम | स्मशानभूमी शेड | ६,५२,०००/- | ६५,२०० |
| १२ | मौजा देवग्राम | गुरांसाठी पाण्याचा हौद | १,३४,०००/- | १३,४०० |
| १३ | मौजा देवग्राम | बाजार ओटे | ११,८९,०६२/- | १,१८,९०६ |
| १४ | मौज सहजापूर | सार्व. शौचालय बांधकाम | १२,०६,०००/- | १,२०,६०० |
| १५ | मौज सहजापूर | समाजमंदीर | १७,९३,०००/- | १,७९,३०० |
| १६ | मौज सहजापूर | बस थांबा | ७,२५,०००/- | ७२,५०० |
| १७ | मौज नायगाव धोटे | स्मशानभूमी शेड | ६,५२,०००/- | ६५,२०० |
| १८ | मौज नायगाव धोटे | बाजार ओटे | ११,९१,८५७/- | १,१९,१८६ |
| १९ | मौज नायगाव धोटे | समाजमंदीर | १७,९३,०००/- | १,७९,३०० |
| २० | मौजे जलालखेडा | समाजमंदीर | १७,९२,८७७/- | १,७९,२८८ |
| | **१० गावे** | **२० कामांना एकूण** | **२,०७,३१,२४८/-** | **२०,७३,१२५** |

<u>अटी व शर्ती</u>

१. विभागीय आयुक्त, नागपूर यांनी त्यांना या आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित कार्यन्वयन यंत्रणेकडे अर्थसंकल्प वितरणप्रणाली BEAMS द्वारे तात्काळ वितरित करावा.

२. संबंधित कार्यन्वयन यंत्रणेने या आदेशान्वये मंजूर केलेला निधी प्राप्त होताच नागरी सुविधा कामांची प्रलंबित देयके तात्काळ अदा करावीत, तदनुषंगाने कार्यपूर्ती अहवाल शासन, विभागीय आयुक्त, नागपूर व जिल्हाधिकारी, नागपूर यांना सत्वर सादर करावा.

३. या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेला व प्राप्त झालेला निधी मंजूर नागरी सुविधा कामांवरच खर्च करण्यात यावा तसेच सदर निधी खर्च करताना मंजूर केलेल्या अनुदानापेक्षा कोणत्याही परिस्थितीत जास्त खर्च होणार नाही याची संबंधित कार्यन्वयन यंत्रणेने दक्षता घ्यावी.

४. मंजूर निधी शासनाच्या पूर्व मान्यतेशिवाय अन्य कामांवर खर्च होणार नाही याची संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

५. सदरच्या आदेशातील नमूद मुख्य लेखाशीर्षांतर्गत प्राप्त झालेला कोणताही निधी शिल्लक राहणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account /PLA (स्वीय प्रपंची खाते) मध्ये जमा करून ठेवण्यात येणार नाही, याची संबंधित कार्यन्वयन यंत्रणेने दक्षता घ्यावी.

६. सदरच्या आदेशातील नमूद मुख्य लेखाशीर्षांतर्गत संबंधित संनियंत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनुसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नुषंगाने या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादि कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत.

७. यासंदर्भातील खर्च विवरणपत्रे/ अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. वरील निधीसंबंधित खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconciliation Slip सह शासनास न चुकता सादर करावीत.

८. संबंधित कार्यन्वयन यंत्रणेने या आदेशान्वये वितरीत निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र Utilization Certificate महालेखापाल कार्यालय, संबंधित जिल्हाधिकारी/ विभागीय आयुक्त/शासनास तातडीने सादर करावीत.

९. यासंदर्भातील लेखाशीर्षाखाली चालू वित्तीय वर्ष सन २०२१-२०२२ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने खर्चाचा विनियोजन लेखा संबधितांनी विहित कालावधीत शासनास सादर करावा.

१०. वित्तीय शिस्तीच्या अनुषंगाने सर्व संबंधितांनी वरील सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.

सदर निधी विभागीय आयुक्त, नागपूर यांना BEAMS प्रणालीवर तातडीने उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही महसूल व वन विभागाच्या म-११ कार्यासनाने करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३११३०२४८६०१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dhananjay Mahesh Nayak

Digitally signed by Dhananjay Mahesh Nayak
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6b0b3c8a4f4c652713fe2c8b99ad7967bd31987605a3a9e2101334fdc07193a3, serialNumber=cb5501110714de26ce81e7da03153eb0f69a36c6bdc2940d70cfee5ed94e63bf, cn=Dhananjay Mahesh Nayak
Date: 2022.03.31 13:04:07 +05'30'

**( ध. म. नायक )**
शासनाचे उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
२. जिल्हाधिकारी, नागपूर
३. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
४. महालेखापाल ( लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नागपूर.
६. अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नागपूर
७. कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद, नागपूर
८. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
९. वित्त विभाग, कार्यासन व्यय-९, अर्थसंकल्प-६, मंत्रालय, मुंबई-३२
१०. महसूल व वन विभाग, कक्ष अधिकारी म-११/ब-१/पीएसी, मंत्रालय, मुंबई ३२.
११. निवडनस्ती कार्यासन - र-१२, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.